**कोषागरातून रोख देय अनुदान**

अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११
महाजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी
पाणीपुरवठा योजनांच्या देखभाल
दुरुस्तीसाठी अनुदाने.
**लेखाशिर्ष (२२१५ २०८२)**

# महाराष्ट्र शासन

## पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्र. देप्रोअ-१३१० / प्र. क्र.४० /पापु-०८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक १ सप्टेंबर,२०१०

संदर्भ :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंदाज-२०.१०/प्र.क्र. ७१/२०१०/अर्थसंकल्प-३
दि. १८ मे, २०१०.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१०(महाराष्ट्र विनियोजन(लेखानुदान) अधिनियम,२०१० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे, आणि ते २०१० चा अधिनियम क्रमांक ८ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८ दिनांक २७ एप्रिल, २०१० यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

त्यानुसार, ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये रु. ३,७५,३०,५०० निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी माहे, सप्टेंबर २०१० मध्ये कॅश-फ्लो नुसार संगणक वितरण प्रणालीद्वारे जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलब्ध रु. ३,७५,३०,५०० (रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष तीस हजार पाचशे फक्त) तरतूद शासन, सोबत जोडलेल्या विवरण पत्रातील स्तंभ क्र. ३ नुसार संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना माहे सप्टेंबर, २०१० मधील कॅश-फ्लो नुसार पुढील अटींवर रोख मंजूर व मुक्त करीत आहे.

अ) जिल्हा परिषदांनी हे अनुदान सन २०१०-११ या आर्थिक वर्षात केवळ ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तासाठी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.
ब) जिल्हा परिषदांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) वरील अटी / शर्तीची  जिल्हा परिषदांकडून पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा संपूर्ण मदत व सुविधा पुरवीतील.

ड) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१०८९ / सीआर-३०२७ / २८, दि. ५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना जिल्हा परिषदांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५, पापु-८ व पापु-२० ला सादर करावे.

२.  यासाठी होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, "२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२-ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम(०२)(१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना-देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदान (२२१५ २०८२) ३१, सहाय्यक अनुदाने(वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतुदीतून भागवावा.

३.  सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन शासन निर्णयाच्या अनुषंगाने या विभागास अर्थसंकल्पीत तरतूद वितरीत करण्यास दिलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर निधी Cash Flow नुसार सप्टेंबर महिन्यात आहरीत करुन घ्यावा.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०११३४२२९००१  असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sd/-
(गौ. सं. पवार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व
२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
४) सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणीपुरवठा विभाग)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
६) मुख्य अभियंता, भारत निर्माण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) जिल्हा कोषागरे अधिकारी (सर्व)
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद व नागपूर.
११) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष (सर्व)
१२) नियोजन / वित्त विभाग (व्यय-३) मंत्रालय, मुंबई
१३) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४, पापु-०५ व पापु-२०
१४)निवडनस्ती, पापु-०८

## विवरणपत्र

शासन निर्णय क्र. देप्रो१३१०/प्र.क्र. ४०/पापु-०८, दिनांक १ सप्टेंबर,२०१० चे सहपत्र

लेखाशीर्ष २२१५ २०८२ खाली ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये वितरीत करावयाचा निधी

(रु. हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सप्टेंबर २०१० मध्ये कॅशफ्लोनुसार वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | १५७१ |
| २ | रायगड | ११७९ |
| ३ | रत्नागिरी | १०६० |
| ४ | सिंधुदुर्ग | ५५४ |
| ५ | नाशिक | २१५४ |
| ६ | धुळे | ८८९ |
| ७ | नंदूरबार | ७८२ |
| ८ | जळगाव | १८५३ |
| ९ | अहमदनगर | २२८१ |
| १० | पुणे | २१३७ |
| ११ | सातारा | १६९९ |
| १२ | सांगली | १३७४ |
| १३ | सोलापूर | १८४९ |
| १४ | कोल्हापूर | ७४० |
| १५ | औरंगाबाद | १२७५ |
| १६ | जालना | ९२० |
| १७ | परभणी | ७३५ |
| १८ | हिंगोली | ५८८ |
| १९ | बीड | १२५० |
| २० | नांदेड | १५४१ |
| २१ | उस्मानाबाद | ८८३ |
| २२ | लातूर | ३४६ |
| २३ | बुलढाणा | १२४० |
| २४ | अकोला | ७०७ |
| २५ | वाशिम | ५९२.५ |
| २६ | अमरावती | १२०३ |
| २७ | यवतमाळ | १४१० |
| २८ | वर्धा | ६४३ |
| २९ | नागपूर | १०२५ |
| ३० | भंडारा | ६७७ |
| ३१ | गोंदिया | ७४५ |
| ३२ | चंद्रपूर | ९९१ |
| ३३ | गडचिरोली | ६३७ |
|  | **एकूण** | **३७५३०.५०** |

**एकूण रु. तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष तीस हजार पाचशे फक्त**

(गौ. सं. पवार)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन